राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सन २०१०-११ मध्ये कृषि संलग्न क्षेत्रांशी संबंधित प्रकल्पांना मान्यता देण्याबाबत

रत्नागिरी येथील निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन केंद्रांची सुधारणा व बळकटीकरण

**महाराष्ट्र शासन**

कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. मत्स्यआ-२०१०/प्र.क्र.२२२/१०/पदुम-१२,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक:- ०६ सप्टेंबर,२०१०

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने कृषि व सलग्न क्षेत्राच्या विकास दरात वाढ करण्याकरीता अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत राष्ट्रीय कृषि विकास योजना हा कार्यक्रम राबविण्यास सन २००७-२००८ पासून सुरुवात केली आहे. या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून पायाभूत सुविधा तसेच वैयक्तिक लाभार्थीकरिता प्रकल्प राबविले जातात. राज्यातील तटीय जिल्हयातील रत्नागिरी येथील निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन केंद्रांची सुधारणा व बळकटीकरण करण्यात येणार आहे. त्यानुसार निमखारे पाणी मत्स्यसंवर्धन केंद्रांची सुधारणा व बळकटीकरण करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:-**

१. निमखारे पाणी मत्सबीज संवर्धन केंद्रांची सुधारणा व बळकटीकरण करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाव्दारे मंजुर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग व अंमलबजावणी यंत्रणेस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) सदर मत्स्यबीज संवर्धन केंद्रांच्या प्रस्तावीत कामांचे आराखडे व अंदाजपत्रके संबंधित जिल्हयांच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून तयार करण्यात यावेत.

२) सन २०१०-२०११ या वर्षात उपरोक्त योजना नव्याने राबविल्या जात असतील तर त्यासाठी आवश्यक असलेला निधी, त्याकरीता करण्यात आलेल्या कामाचे नियोजन, याबाबतच्या निश्चित प्रस्तावास प्रशासकीय व तांत्रीक मान्यता दयावी.

३) मंजूर प्रकल्पांवर किती निधी खर्च करणे शक्य आहे, याचा आढावा घेऊन त्यानुसार निधी वितरणाकरीता आवश्यक तो प्रस्ताव या विभागाकडे सादर करावा.

४) मंजुर करण्यात आलेल्या प्रकल्पांना केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या निधीच्या उपलब्धतेनुसार निधी वितरीत केला जाईल.

५) सदर निधी या योजनेसंबंधीच्या केंद्र शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन खर्च करावा.

६) प्रकल्प राबवितांना त्यांची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मूल्यमापन करण्यासंदर्भात आवश्यक तो समन्वय संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने राष्ट्रीय कृषि विकास योजनेचे समन्वयक म्हणून संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय व प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्याशी ठेवावा.

७) संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा. तसेच सदरहू लेख्यांचे लेखा परीक्षण महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई अथवा महालेखापाल -२ नागपूर यांच्याकडून करुन घ्यावे.

८) संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी या योजनेबाबतचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करावीत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.**maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००९०६१९३०३३००१** असा असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सही/-**

( प. श. अहमद)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

- प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
- प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- प्रधान सचिव (कृषि विभाग), कृषि व पदुम विभाग, मुंबई-३२.
- आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- सर्व विभागीय आयुक्त,
- सर्व जिल्हाधिकारी,.
- सर्व संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
- प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व .
- सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व.
- महालेखापाल (लेखा परिक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर,
- महाराष्ट्र - १ मुंबई.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- सर्व कोषागार अधिकारी.
- निवड नस्ती.